**मौजे पेठ ता. वाळवा जि. सांगली येथील तीळगंगा नदीवरील पूर सरंक्षक भिंतीच्या कामाच्या अंदाजपत्रकाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०२१/ (प्र.क्र. ३५३/२०२१)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ३० डिंसेबर, २०२१.

वाचा : १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७ ऑगस्ट, १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.(म) दि.३१/८/२०१९

३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मकृखोविम /३७/(१८५/२०२१)/ सिंव्य-२/४८७८ दि. ३०.०९.२०२१.

**प्रस्तावना :-**

मौजे पेठ , ता. वाळवा, जि सांगली या गावामधून तीळगंगा नदी वाहते. नदीच्या एका बाजूस तात्कालीन सातारा जिल्हा अधिनस्त लोकल बोंड यांचे मार्फत दगडी बांधकामातील जुनी पूरसंरक्षक भिंत आहे. तसेच नदीच्या बाजूस रस्ता , अंगणवाडी, ग्रामस्थांची घरे आहेत. सन २०१९ मध्ये नदीस आलेल्या महापुरामूळे तसेच या वर्षी एप्रिल व मे महिन्यात झालेल्या वादळी पावसामुळे अस्तित्वात असलेल्या भिंतीचे नुकसान होऊन पडझड झाली आहे व त्यामुळे नदीवरील ग्रामस्थांची घरे, मंदिरे , अंगणवाडी, रस्ते यांना धोका निर्माण झाला आहे.

मा. मंत्री ( जलसंपदा व लाभक्षेत्र विकास ), महाराष्ट्र राज्य यांनी दिनांक २४/५/२०२१ रोजीच्या क्षेत्रीय भेटी दरम्यान नवीन भिंत व घाट तसेच आवश्यक तेथे, अस्तित्वात असलेल्या भिंतीजवळ, नवीन पूरसंरक्षक आधार भिंत बांधून देणेबाबत निर्देश दिले होते.

त्यानुसार मौजे पेठ येथील नदीवर जुन्या पुरसंरक्षक भिंतीस आधार भिंतीचे बांधकाम व आवश्यक तेथे नवीन भिंत व घाट बांधकाम करणेचे ठिकाणी प्रत्यक्ष पाहणी करून सर्वेक्षण करणेत येऊन सदर कामाचे नव्याने अंदाजपत्रक तयार करणेत आले आहे. सदर मौजे पेठ, ता. वाळवा , जि सांगली येथील तीळगंगा ओढयाकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौजे पेठ ता. वाळवा, जि. सांगली येथील तीळगंगा ओढयाकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. ४९३८३१८५ /- (चार कोटी त्रयानऊ लक्ष त्रयाऐंशी हजार एकशे पच्याऐंशी) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२१-२२ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य (म) दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य (कामे) ,दि. २१.९.१९८९ व दि. ३/५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) i) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने ,दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ii) तात्रिक मान्यतेपूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन Loft type किंवा Counterfort इ. पर्यत यांचा विचार करुन खर्च कमी होण्याच्या दृष्टीने मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, कडून मंजूर घ्यावे.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे पेठ, ता. वाळवा, जि सांगली येथील तीळगंगा ओढयाकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास सांगली जिल्हापरिषद, सांगली ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र मौजे पेठ ता वाळवा जि सांगली येथील तीळगंगा ओढयाकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामाच्या प्रस्तावास, सांगली जिल्हापरिषद, सांगली कडून प्राप्त करून घेण्याची जबाबदारी सक्षम अधिका-यांची असेल.

फ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ग) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयातील अटींचे कोटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

म) अंदाजपत्रकामध्ये रु. १.९० लक्ष ( एक लक्ष नव्वद हजार) ऐवढी रक्कम वृक्षलागवडी करीता आरक्षित आहे. सदर बाबीकरीता सक्षम स्तरावर मंजुरी घेऊन प्रचलित शासन निर्णयाचे काटेकोर पालन केले जाईल , याची दक्षता घ्यावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २१ / सन २०२१ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३०१२२००४२८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.12.30 12:20:35 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
८) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,
१४) मुख्यअभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.३५३/२०२१)/ सिंव्य (महसूल),

## दि. ३०/१२ /२०२१ चे सहपत्र

| Sr. No. | Item | Amount ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C – Works (excluding Royalty) | ३८१९५१३४ |
| २ | Royalty | ४८८५८५४ |
| ३ | १ % Insurance | ३८१९५१ |
| ४ | १२ % GST | ४५८३४१६ |
| ५ | ३ % Contingencies | ११४५८५४ |
| | **Total Rs.** | **४९३८३१८५** |

Vaijnath
Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.12.30 12:20:48 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )
शासनाचे उप सचिव